**प्रशासकीय मान्यतेमध्ये समावेश करण्यात आलेल्या अटींच्या अनुषंगाने कार्यवाही करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक-संकिर्ण-२०१७/प्र.क्र.९/नियोजन-३**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२,**
**दिनांक:-२७/०४/२०१७.**

**प्रस्तावना:-**

नियोजन-३ या कार्यासनाकडून सा.बां.विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयाकडून प्राप्त रस्ते व पुल बांधकामांच्या प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येते. मार्च-२०१७ च्या अर्थसंल्पिय अधिवेशात रस्ते, पूल, रेल्वे उड्डाणपुल इ. बांधकामांचा समावेश करण्याकरीता क्षेत्रिय कार्यालयांकडुन प्रशासकीय मान्यतेकरीता प्रस्ताव शासनास प्राप्त झालेले होते. प्राप्त झालेल्या प्रस्तावांना दि.१/०३/२०१७ ते दि.९/०३/२०१७ या कालावधीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या आहेत. प्रदान करण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या आदेशामध्ये **"रस्ते बांधकाम/दुरुस्ती व नविन बांधकाम तसेच पूल व पुलांचे जोडरस्ते बांधल्यानंतर १ ते २ वर्षातच नादुरुस्त झाल्याचे काही प्रकरणी आढळले आहे. यापुढे डांबरी रस्त्याचे आर्युमान १५ वर्ष, काँक्रीट रस्त्याचे ३० वर्ष व पुलाचे १०० वर्षापर्यंत गृहीत धरुन संकल्पन करण्यात यावे. अशा प्रकारे काम न केल्यास व नंतर प्रशासकीय मान्यता प्राप्त लांबीत खड्डे पडल्यास काम खराब झाल्यास किंवा पूल पडल्यास त्याची सर्व जबाबदारी कंत्राटदार व संबंधीत पर्यवेक्षकीय अधिकारी यांची राहील. त्या संबंधाची विशेष अट निविदेत नमूद करावी. ही कारवाई Civil/Criminal स्वरुपाची राहील याची नोंद संबंधीतांनी घेतली आहे असे प्रमाणपत्र निविदेमध्ये जोडावे व त्यावर कंत्राटदाराची सही घ्यावी. तसेच सर्व संबंधीत अधिकाऱ्यांना याची जाणीव लिखीत स्वरुपात कळवावी. तांत्रिक मान्यता देतांना संबंधीत सक्षम अधिकाऱ्यांनी याची नोंद तांत्रिक मंजूरी आदेशात करावी व तसे अभिलेखामध्ये ठेवावे."** या अटीचाही कामनिहाय समावेश इतर अटींसह करण्यात आलेला आहे.

उपरोक्त नमूद अटीचा शासनास प्राप्त झालेल्या बहुतांश सर्वच प्रस्तांवाना प्रदान करण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेमध्ये समावेश करण्यात आलेला आहे. परंतु सदर अट नेमक्या कोणत्या प्रकारच्या कामांकरीता लागू राहील, अशी विचारणा विविध क्षेत्रिय कार्यालयाकडून करण्यात आल्यामुळे सदर बाबीसंदर्भात खालील स्पष्टीकरण निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन आदेश :-**

प्रशासकीय मान्यतेच्या आदेशांमध्ये समाविष्ट करण्यात आलेली "रस्ते बांधकाम/दुरुस्ती व नविन बांधकाम तसेच पूल व पुलांचे जोडरस्ते बांधल्यानंतर १ ते २ वर्षातच नादुरुस्त झाल्याचे काही प्रकरणी आढळले आहे. यापुढे डांबरी रस्त्याचे आर्युमान १५ वर्ष, काँक्रीट रस्त्याचे ३० वर्ष व पुलाचे १०० वर्षापर्यंत गृहीत धरुन संकल्पन करण्यात यावे. अशा प्रकारे काम न केल्यास व नंतर प्रशासकीय मान्यता प्राप्त लांबीत खड्डे पडल्यास काम खराब झाल्यास किंवा पूल पडल्यास त्याची सर्व जबाबदारी कंत्राटदार व संबंधीत पर्यवेक्षकीय अधिकारी यांची राहील. त्या संबंधाची विशेष अट निविदेत नमूद करावी. ही कारवाई Civil/Criminal स्वरुपाची राहील याची नोंद संबंधीतांनी घेतली आहे असे प्रमाणपत्र निविदेमध्ये जोडावे व त्यावर कंत्राटदाराची सही घ्यावी. तसेच सर्व संबंधीत अधिकाऱ्यांना

याची जाणीव लिखीत स्वरुपात कळवावी. तांत्रिक मान्यता देतांना संबंधीत सक्षम अधिकाऱ्यांनी याची नोंद तांत्रिक मंजूरी आदेशात करावी व तसे अभिलेखामध्ये ठेवावे."

ही अट **IRC-३७/IRC-५८ मधील तरतुदीप्रमाणे बांधावयाच्या रस्त्यांसाठी (डांबरी रस्त्यांसाठी १५ वर्ष व कॉंक्रीट रस्त्यांसाठी ३० वर्ष आयुर्मान) व IRC Code मधील तरतूदीप्रमाणे १०० वर्ष आयुर्मान संकल्पित करुन बांधावयाच्या नविन पुलाच्या अर्थसंकल्पिय बाबींसाठी लागू राहील. देखभाल व दुरुस्तीच्या अंदाजपत्रकीय (M&R) द्विवार्षिक देखभाल व दुरुस्ती व कालबध्द नुतनीकरणाच्या (Periodic Renewal)कामांना ही अट लागू होणार नाही कृपया याची नोंद घेऊन तांत्रिक मान्यता आदेश निर्गमित करावे व निविदा प्रक्रिया मसुद्यात त्याप्रमाणे नोंद करावी.**

वरील परिपत्रकाची तात्काळ अंमलबजावणी करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेताक २०१७०४२७१३०१२९५९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash K Ingole

Digitally signed by Prakash K Ingole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DEPUTY SECRETARY BLDS, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3e67265689b1060d15b7956db930c838cb8188 45016d02e4d9d24a7fe1f2309, cn=Prakash K Ingole
Date: 2017.04.27 13:01:27 +05'30'

**(प्रकाश इंगोले)**
उपसचिव (रस्ते), महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.

२. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.

३. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग/जिल्हा परिषद (सा.बां.) विभाग.

४. निवडनस्ती.